**शाहु, फुले, आंबेडकर दलित वस्ती सुधारणा व स्वच्छता अभियान या अभियानांतर्गत सन २०१९-२० या वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी खर्च करण्यासाठी मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : अनौसं-२०१९/प्र.क्र.११०/अजाक**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: ११ ऑक्टोबर, २०१९.

वाचा: शासन ज्ञापन, सम क्रमांक, दिनांक २१ मे, २०१९.

ज्ञापन :

आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना कळविण्यात येत आहे की, "शाहू, फुले, आंबेडकर दलित वस्ती सुधारणा व स्वच्छता अभियान" या अभियानांतर्गत हिरीरीने सहभागी होऊन कार्य केलेल्या ग्रामपंचायतींना पुरस्कार देण्यासाठी सन २०१९-२०या वर्षातील अर्थसंकल्पित निधीपैकी शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०८ जुलै, २०१९ अन्वये सन २०१९-२० या वर्षाच्या प्रथम नऊमाहीकरीता (माहे डिसेंबर,२०१९ अखेर) अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६० टक्केच्या मर्यादेत अर्थसंकल्प अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर देण्यात आलेला असून सदर निधीपैकी रुपये ३२,०००/- (अक्षरी रूपये बत्तीस हजार फक्त)निधी खर्च करण्यासाठी उपरोक्त वाचा अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

आता नव्याने उपरोक्त शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्प अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर देण्यात आलेला उर्वरीत रुपये २८,०००/- (अक्षरी रूपये अठ्ठावीस हजार फक्त) निधी खर्च करण्यासाठी मान्यता देण्यात येत आहे. याबाबतचे विवरण खालीलप्रमाणे आहे:

**(रुपये हजारात)**

| अ.क्र. | शाहु, फुले, आंबेडकर दलित वस्ती सुधारणा व स्वच्छता अभियान | अर्थसंकल्पित निधी रुपये | या ज्ञापनाद्वारे खर्च करण्यासाठी मान्यता देण्यात येत असलेला निधी रुपये |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | २२२५,<br>३१,सहायक अनुदाने (वेतनेत्तर)<br>२२२५ ३३७ ८ | १००<br>(अक्षरी रुपये एक लक्ष फक्त) | २८<br>(अक्षरी रुपये अठ्ठावीस हजार फक्त) |

२. सदर निधी, उक्त उल्लेखित योजनेकरीता या अगोदर वितरीत करण्यात आलेल्या (रुपये ३२,०००/- (अक्षरी रूपये बत्तीस हजार फक्त)) अनुदानाचे/निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करण्यात यावे आणि शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०१ एप्रिल व ०८ जुलै,२०१९ मधील नमूद केलेल्या प्रत्येक बाबीची पूर्तता करण्यात यावी, या अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

३. नियंत्रण अधिकारी यांनी उपरोक्त विवरणातील रकाना ४ मधील निधी खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर त्याबाबतचे विवरण व उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्यात यावे.

४. शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०१ एप्रिल व ०८ जुलै,२०१९ मधील नमूद केलेल्या प्रत्येक बाबीची पूर्तता झालेली आहे, असे प्रमाणित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत अभियानावर होणारा खर्च खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०१९-२० या वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीतून भागविण्यात यावा:

मागणी क्रमांक एन-३

मुख्य लेखाशीर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण

०१, अनुसूचित जातींचे कल्याण

(०७) (०५) शाहु, फुले, आंबेडकर दलित वस्ती सुधारणा व स्वच्छता अभियान. (अ.जा.उ.यो.) (कार्यक्रम)

३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर)

२२२५ ३३७ ८

६. नियंत्रण अधिकारी यांनी खर्च करताना शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०१ एप्रिल व ०८ जुलै, २०१९ मधील बाबींची पूर्तता करण्याची दक्षता घ्यावी. सदर योजनेचा निधी वितरीत करताना आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी उपयोगिता प्रमाणपत्रे तपासणीच्या अधिन राहून निधी वितरीत करावा.

७. सदर ज्ञापन शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०१ एप्रिल व ०८ जुलै,२०१९ नुसार प्रशासकिय विभागास प्राप्त वित्तीय अधिकारांतर्गत आणि विभागाच्या अर्थसंकल्प कार्यासनाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१९१०१७१५२८४८९९२२ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil D Sardar

Digitally signed by Sunil D Sardar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0098eb68042c66b72115bc62ef9206ece42981aab126657128d7cadca447533, cn=Sunil D Sardar
Date: 2019.10.17 15:30:09 +05'30'

**( सुनिल सरदार )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
४. महालेखापाल (लेखापरिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
५. महालेखापाल (लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
६. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. सर्व प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण विभाग.
८. सर्व सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण.
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०. कोषागार अधिकारी, पुणे.
११. वित्त विभाग (व्यय-१४ / अर्थसंकल्प-३), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१२. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प/विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती /अजाक.